**प्रतिबंधित अन्न पदार्थ, गुटखा, पानमसाला, स्वादिष्ट/सुगंधित सुपारी स्वादिष्ट/सुंगधित तंबाखु इत्यादी बाबत अन्न औषध प्रशासनाच्या अधिकाऱ्यांकडून करण्यात येणाऱ्या कार्यवाहीमध्ये आवश्यक ती मदत करणेबाबतचा शासन निर्णय रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीआरटी-२०१६/प्र.क्र. ७८/पोल-११**
गृह विभाग, दुसरा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई
तारीख: २५ नोव्हेंबर, २०१६

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः सीआरटी-२०१६/प्र.क्र. ७८/पोल-११, दिनांक २२ मार्च, २०१६**

**प्रस्तावना :**

प्रतिबंधित अन्न पदार्थ, गुटखा, पानमसाला, स्वादिष्ट/ सुगंधित सुपारी, स्वादिष्ट/सुगंधित तंबाखु इत्यादीबाबत अन्न व औषध प्रशासनाच्या अधिकाऱ्यांकडून करण्यात येणाऱ्या कार्यवाहीमध्ये आवश्यक ती मदत करण्याच्या सूचना, वाचा येथील क्र. १ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या होत्या. सदर दिलेल्या सूचना रद्द करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

गुटखा, पानमसाला, इत्यादी तत्सम अन्न पदार्थाचे मानवी आरोग्यावर होणाऱ्या दुषपरिणामाची भयानकता पाहता त्यावर अन्न सुरक्षा व मानके अधिनियम २००६ चे कलम ३० (२) (अ) नुसार असलेल्या अधिकारान्वये सन २०१२, २०१३, २०१४, २०१५ आणि २०१६ साली सदर अन्न पदार्थाचे उत्पादन व विक्री इत्यादीवर अन्न व औषध प्रशासनाकडून प्रतिबंध घातलेला आहे.

सदर प्रतिबंधात्मक आदेशाची प्रभावी व परिणामकारक अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने अन्न व औषध प्रशासनाकडून वेगवेगळ्या उपाय योजना, मोहीम आखून काम करण्यात येते. तथा त्यावर कारवाईसाठी उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयानुसार पोलीस प्रशासनाची मदत घेण्यात येते आणि सदर प्रतिबंधात्मक आदेशाचे उल्लंघन करणाऱ्यावर काही ठिकाणी भा. दं. वि. चे कलम २७२, २७३, १८८ आणि ३२८ खाली प्रथम खबरी अहवाल दाखल करण्यात येत होते.

मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने दिनांक ४ मार्च, २०१६ रोजी रिट याचिका क्रमांक १०२७/२०१५ व इतर मध्ये पोलीस कारवाई रद्दबादल करुन अन्न सुरक्षा अधिकारी यांना पूर्णपणे अन्न सुरक्षा व

मानके अधिनियमांतर्गत पूर्ण अधिकार प्राप्त असल्याने तो संपूर्ण कारवाई करु शकतो. अशा आशयाचा निकाल दिला आहे.

उपरोक्त न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने वाचा येथील क्र.१ हा शासन निर्णय याव्दारे रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२८१२११५०२४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: CN = Yuvraj B Ajetrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2016.11.28 15:44:54 +05'30'

**यु.ब.अजेटराव**
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. अपर मुख्य सचिव (बैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
८. सर्व पोलीस आयुक्त
९. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०.सर्व पोलीस अधिक्षक
११.निवडनस्ती पोल-११